**जायकवाडी डाव्या कालव्यावर पाणी वापर संस्थेच्या ठिकाणी करावयाच्या भाग १ व २ च्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत (मातोश्री पाणी वापर संस्था कंडारी (अंबड) ता.घनसावंगी, जि.जालना)**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सीडीए -२०२४/प्र. क्र.३१/२०२४ लाक्षेवि (कामे)**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दि. १६/०३/२०२४

**वाचा :-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद यांचे पत्र जा. क्र. गोमपाविम/सिंचन -२/विवसु-कड़ा औरंगाबाद /धा- ३३/८७३,दि.१९/०१/२०२४
२. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/ लपा ०२, दि २६/०५/२०१७
३. शासन निर्णय -२०१७ /५६६/१७ /सिंव्य (कामे),दि ३१/०८/२०१८
४. शासन निर्णय - संकिर्ण-२०१८/प्र क्र. ५५१ /१७ सिंव्य (कामे) दि. २७/११/२०१८

**प्रस्तावना -**

जायकवाडी प्रकल्प हा महाराष्ट्र राज्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वकांक्षी प्रकल्प असून या द्वारे राज्यातील अन्नधान्याची तूट भरून काढून त्याबाबतीत राज्य स्वयंपूर्ण होणे अपेक्षित आहे.

पैठण धरणाचे काम सन १९६५ मध्ये सुरू होऊन ते सन १९७४ मध्ये पुर्ण झाले. सिंचनाची सुविधा १९७५-७६ या वर्षापासुन सुरु झाली व ती आता पुर्णपणे विकसित झाली आहे. पैठण डाव्या कालव्यावर ४१६४२ हेक्टर व पैठण उजव्या कालव्यावर ४१६८२ हेक्टर असे एकूण १८३३२२ हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येते.

या प्रकल्पामुळे औरंगाबाद, जालना, परभणी, बीड व अहमदनगर या जिल्हातील जमिनीला सिंचनाचा लाभ मिळतो.

महाराष्ट सिंचन अधिनियम,२००५ नुसार सिंचन पध्दतीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन लागू (MMISF)करण्यासंबंधी दाखल झालेल्या जनहित याचिका क्र.१७३/२०१३ वरील माननीय उच्च न्यायालयाने दि.२३.०९.२०१६ चे दिलेल्या निर्देशानुसार उर्ध्व गोदावरी प्रकल्पापासून माझलगाव प्रकल्पापर्यंत प्रकल्पाच्या लाभक्षेत्राची निश्चिती करून प्रकल्पाचे लागवडीलायक (CCA) क्षेत्रावर पाणी वापर संस्था स्थापन करणे बंधनकारक आहे.

जायकवाडी प्रकल्प हा महाराष्ट्र राज्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वकांक्षी प्रकल्प असून या द्वारे राज्यातील अन्नधान्याची तूट भरून काढून त्याबाबतीत राज्य स्वयंपूर्ण होणे अपेक्षित आहे.जायकवाडी प्रकल्प गोदावरी नदीवर ता. पैठण, जि.छ. संभाजीनगर येथे असुन सन १९७६ साली पूर्ण झालेला आहे.प्रकल्पाच्या डाव्या कालवा वितरिका क्र.२६ वरील मायनर क्र.६ व ८ चे क्षेत्रावर मातोश्री पाणी वापर संस्था कंडारी (अंबड) ता.घनसावंगी, जि.जालना ही संस्था म.सि.प.शे.व्य.२००५ अंतर्गत गठीत करण्यात आलेली आहे.

या अनुषंगाने जायकवाडी डाव्या कालव्यावर पाणी वापर संस्थेच्या ठिकाणी करावयाच्या भाग १ व २ च्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत (मातोश्री पाणी वापर संस्था कंडारी (अंबड) ता.घनसावंगी, जि.जालना) च्या प्रस्तावित कामांना विशेष दुरुस्ती कामाअंतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) जायकवाडी डाव्या कालव्यावर पाणी वापर संस्थेच्या ठिकाणी करावयाच्या भाग १ व २ च्या कामांना (मातोश्री पाणी वापर संस्था कंडारी (अंबड) ता.घनसावंगी, जि.जालना) विशेष दुरुस्तीचे कामाअंतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर कामाप्रित्यर्थ रुपये १९५८३९३४/- (रू एक कोटी पंचान्नव लाख त्र्याऐंशी हजार नऊशे चौतीस फक्त) व इतर अनुषंगिक खर्च ६९६९२६८ /- (एकोण सत्तर लक्ष एकोणसत्त हजार दोनशे अडुसष्ठ फक्त) एकूण रु २,६५,५३,२०२/- (रु दोन कोटी पासष्ठ लाख त्रेपन्न हजार दोनशे दोन फक्त) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

उपरोक्त बाबी विचारात घेता सदर विशेष दुरूस्ती कामाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

i) शासन परिपत्रक क्र प्रमा -२०१३/ (७८५/१३) / सिंव्य (कामे),दि.०१/०१/२०१५ मधील मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे, अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

ii) तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनेवर आधारीत तरतुद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

iii) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पनेत दर सूची बाहयबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षम स्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

iv) महाराष्ट्र सिंचन अधिनियम २००५ नुसार सिंचन पद्धतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन (MMISF) लागू करण्याबाबत स्थापित पाणी वापर संस्थेचे संबंधित पदाधिकारी व क्षेत्रिय अधिकारी यांनी संयुक्त, पहाणी करून लाभक्षेत्रातील पाणी वापर सदस्यांना विश्वासात घेऊनच वितरण प्रणालीच्या विशेष दुरुस्तीसाठी आवश्यक तरतुद करणे. प्रकल्पावरील पाणीवापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे कालबद्ध नियोजन काम सुरु करण्यापुर्वी करावे तद्नंतरच निविदा प्रक्रिया कार्यवाही हाती घेण्यात यावी.

v) प्रस्तावित वितरण प्रणालीच्या विशेष दुरुस्तीचे कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस विहित कालमर्यादेत हस्तांतरीत करणे याची जबाबदारी पुर्णपणे अधीक्षक अभियंता यांची राहील.

vi) प्रस्तावीत कामांमुळे (खोदकाम / तोडफोड )उपलब्ध होणाऱ्या बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करून बचत साधावी.

vii) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पुर्ण करण्यात यावा.

viii) सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पुर्ण झाल्यानंतर त्या बाबत पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा. विषायांकीत प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतुदी, दर, वहन अंतर, संकल्पना व इतर तांत्रिक निकष याबाबत संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय मुख्य अभियंता व अधिक्षक अभियंता यांची राहील.

ix) सदर प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील कामासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादे बाहर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलीत शासन निर्णय ,CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अमंलबजावणी करण्यात यावी.

२. प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च ठोक तरतूद (०४)(०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०० ०२६५) (मराठवाडा विभाग) या लेखाशिर्षाखालील विशेष दुरुस्तीकरीता जनहित याचिका क्रं १७३/२०१२ करिता मंजुर अनुदानातून भागविण्यात येणार आहे

३. शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२,दि.२६/०५/२०१७ अन्वये विशेष दुरूस्ती कामास मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत.त्याअनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. या कामास प्रधान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीत सन २०२३-२४ मध्ये अ.क्र ०५ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१६१७१३३९१२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAIBHAV HANAMANTRAO PHALKE

Digitally signed by VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=71fecd9f3e74a92a87c45c1824f9c8265082bcdd03e9b87813d104e5e1c1d477, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4ABB61BFEA711AD5A1CFA209E9ADEE68129EF052F3865D6928401D4BD155B7A3, cn=VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
Date: 2024.03.18 15:26:25 +05'30'

**( वैभव फाळके )**
**अवरसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३. मा. उपमुख्यमंत्री तथा जलसंपदा मंत्री यांचे कार्यालय,
४. मा. उपमुख्यमंत्री वित्त व नियोजन यांचे कार्यालय,
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. अ.मु.स (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१३.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर,
१४. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक लाभक्षेत्र विकास (जलसंपदा विभाग), छत्रपती संभाजीनगर,
१५. आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. अधीक्षक अभियंता तथा उपसचिव (सिं.व्य.) यांना माहितीसाठी.
१७. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास व प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर,
१८. कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग, नाथनगर (उ) पैठण,
१९. लाक्षेवि (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांकः सीडीए-२०२४/प्र.क्र.३१/२४/लाक्षेवि (कामे)

**जायकवाडी डाव्या कालव्यावर पाणी वापर संस्थेच्या ठिकाणी करावयाच्या भाग १ व २ च्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत (मातोश्री पाणी वापर संस्था कंडारी (अंबड) ता.घनसावंगी, जि.जालना)**

**सर्वसाधारण गोषवारा -**

| अ. क्र | उपशिर्षे | अंदाजित रक्कम (लाख) |
|---|---|---|
| १. | ए-प्राथमिक | ० |
| २ | बी-भूसंपादन | ० |
| ३. | सी-कामे | १९५८३९३४ |
| ४. | के-इमारत | ० |
| ५. | एम-वृक्षारोपण | ० |
| ६. | ओ-संकिर्ण | ० |
| ७. | पी-देखभाल | ० |
| ८. | आर-दळणवळण | |
| अ. | कामाप्रित्यर्थ एकूण | १९५८३९३४ |
| ब. | १८% वस्तू व सेवाकर | ३५२५१०९ |
| क. | १% विमा शुल्क | १९५८४० |
| ङ | चाचणी शुल्क | ३९१६७९ |
| इ. | स्वामीत्व शुल्क | २८५६६४० |
| | एकूण रक्कम | २६५५३२०२ |

VAIBHAV HANAMANTRAO PHALKE

Digitally signed by VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=71fecd9f3e74a92a87c45c1824f9c8265082bcdd03e9b8781 3d104e5e1c1d477, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4ABB61BFEA711AD5A1CFA209E9ADEE68129EF052F 3865D6928401D4BD155B7A3, cn=VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
Date: 2024.03.18 15:26:48 +05'30'

( वैभव फाळके )
अवरसचिव, महाराष्ट्र शासन